भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील गट-अ व गट-ब संवर्गातील (तांत्रिक/अतांत्रिक) जे २० अधिकारी दोन संधीत विभागीय परीक्षा उत्तीर्ण झालेले नाहीत अशांना विभागीय परीक्षेस बसण्यास एक विशेष संधी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आपना ०२२१/प्र.क्र. ९६/पापु-१५**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल,
क्रॉफर्ड मार्केटजवळ, नवीन मंत्रालय इमारत, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१
तारीख: २९ ऑक्टोबर, २०२१

<u>वाचा</u>

**१) आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांचे पत्र क्र. प्रशासन/आस्था-२/ प्र.क्र.७/ वि.परीक्षा/२३५/२०२१, दि. २८.०५.२०२१.**

<u>प्रस्तावना</u>

भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील गट-अ व गट-ब संवर्गातील (तांत्रिक/ अतांत्रिक) राजपत्रित अधिकाऱ्यांसाठी विभागीय परीक्षा विभागीय परीक्षा नियमावली, १९९२ मधील तरतूदीनुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत घेण्यात येते. विभागीय परीक्षा नियमावली, १९९२ मधील तरतूदीनुसार २ वर्षाच्या परिविक्षा कालावधीमध्ये विभागीय परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. मात्र सन २००८, सन २०१३, २०१७ मध्ये विभागीय परीक्षा आयोजित झाल्याने भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील एकूण २० अधिकाऱ्यांना विहित परिविक्षा कालावधीमध्ये विभागीय परीक्षा उत्तीर्ण होता आलेले नाही. सदर २० अनुत्तीर्ण उमेदवारांना विहित परिविक्षा कालावधीमध्ये पुरेशी संधी मिळाली नसल्याने तसेच सदर विभागीय परीक्षेच्या संधीतील कालावधी व सदर उमेदवार महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत पात्र असून शासकीय सेवेतील दीर्घ कालावधी विचारात घेता भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील गट-अ व गट-ब संवर्गातील जे २० अधिकारी (तांत्रिक/अतांत्रिक) दोन संधीत विभागीय परीक्षा अनुत्तीर्ण झाले अशा अधिकाऱ्यांना विभागीय परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठी एक विशेष संधी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

०२. भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील गट-अ व गट-ब संवर्गातील (तांत्रिक/ अतांत्रिक) राजपत्रित अधिकाऱ्यांसाठी विभागीय परीक्षा विभागीय परीक्षा नियमावली, १९९२ मधील तरतूदीनुसार २ वर्षाच्या परिविक्षा कालावधीमध्ये विभागीय परीक्षा उत्तीर्ण होऊ शकले नाहीत अशा सोबतच्या

परिशिष्टातील २० उमेदवारांना विभागीय परीक्षेस बसण्यासाठी एक विशेष अंतिम संधी या शासन निर्णयाद्वारे देण्यात येत आहे. सदर बाब पूर्वोदाहरण म्हणून समजण्यात येऊ नये. सदरील २० अधिकाऱ्यांना कोणत्याही सबबीवर अतिरिक्त संधी देता येणार नाही.

०३. सदर अधिकाऱ्यांना विभागीय परीक्षेस बसण्यासाठी देण्यात येत असलेल्या संधीच्या संख्येबाबत भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेने खातरजमा करावी.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२९१३१९२४४०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ganesh Nivrutti Pawar

Digitally signed by Ganesh Nivrutti Pawar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, serialNumber=1325a2533f628572438b5fb711c805de49788678b97015bb0cac990e3b375423, cn=Ganesh Nivrutti Pawar
Date: 2021.10.29 15:50:54 +05'30'

**( गणेश पवार )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, शिवाजीनगर, पुणे.
२. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सर्व.
३. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सर्व.
४. निवडनस्ती (पापु-१५)

## परिशिष्ट

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | श्री. बनसोडे वाल्मिक जालिंदर | सहाय्यक भूवैज्ञानिक |
| २ | श्री. बेडसे प्रकाश सुखदेव | सहाय्यक भूवैज्ञानिक |
| ३ | श्री. चव्हाण चक्रधर दौलतराव | सहाय्यक भूवैज्ञानिक |
| ४ | श्री. चव्हाण शिवलिंग तुकाराम | कनिष्ठ भूवैज्ञानिक |
| ५ | श्री. दाबेराव इंद्रजित मंगलसिंग | कनिष्ठ भूवैज्ञानिक |
| ६ | श्री. घरटे लक्ष्मण अरूण | कनिष्ठ भूवैज्ञानिक |
| ७ | श्री. गोलांगे लक्ष्मणराव प्रशांत | कनिष्ठ भूवैज्ञानिक |
| ८ | श्री. जवंजाळ विजय श्रीराम | सहाय्यक भूवैज्ञानिक |
| ९ | श्री. जिरंगे अमित गणपतराव | कनिष्ठ भूवैज्ञानिक |
| १० | श्री. कराळे प्रमोद नारायणराव | उपअभियंता (यां) |
| ११ | श्रीम. मडामे शिल्पा नि. (कु. एस.ए.शिवरकर) | कनिष्ठ भूवैज्ञानिक |
| १२ | श्री. माने संदिप अशोक | सहाय्यक भूवैज्ञानिक |
| १३ | श्री. निंबाळकर विनायक नवनाथ | कनिष्ठ भूवैज्ञानिक |
| १४ | श्री. पवार रवि विश्वनाथ | कनिष्ठ भूवैज्ञानिक |
| १५ | श्री. पोळ प्रमोद सोपानराव | कनिष्ठ भूवैज्ञानिक |
| १६ | श्री. साबळे संजय महादेव | कनिष्ठ भूवैज्ञानिक |
| १७ | श्रीम. सावळे सुजाता राजू | सहाय्यक भूवैज्ञानिक |
| १८ | श्री. सोळंके विजय रामराव | कनिष्ठ भूवैज्ञानिक |
| १९ | श्री. टोहरे श्रीपाद प्रकाशराव | सहाय्यक भूवैज्ञानिक |
| २० | श्रीम. येवले तृप्ती उमाकांत (तृप्ती गोपाळराव मोरे) | कनिष्ठ भूवैज्ञानिक |